ॐ श्रीगणेशाय नमः । आदिशक्ति सांगे तदनंतर । महेशान जाहले भ्रांत फार । मयूरक्षेत्रीं मयूरेश्वर । त्यांना दिसला त्या वेळीं ।।१।। तेव्हां ते स्वानंदरूप गणनायकास । ध्याती भ्रूशुण्डीस ब्रह्मरूपास । ते आठविती गणपप्रियास । पूजिती प्रार्थिती गणेश्वरासी ।।२।। देवेश म्हणती मयूरा

दाखवी । स्वरूप आपुलें सत्वरी । अज्ञान आवरण दूर करी । आम्ही विनत तुझिया पायीं ।।३।। आतां आम्हांस रक्षावें । आम्हां तुझ्याहून अन्य न ठावें । आद्य तत्त्व तूंचि स्वभावें । दया करी दयाळा ।।४।। वेदमुख्य षडंगासहित । गणेशश्वासांतून संभूत । तेथ आले अकस्मात । देवेशांसी ज्ञानदाते ।।५।। त्यांस पाहून तेज:पुंजास । देवसत्तम करिती वंदनास । म्हणती विनम्र वचन तयास । कोण आपण सांगावें ।।६।। अज्ञान आवरणें युक्त । गणेशस्मरणीं आसक्त । आम्हीं असतां या स्थलाप्रत । गणेशानें का पाठविलें ।।७।। वेद तेव्हां त्यांस सांगती । आम्ही वेद षडंगासह प्रीती । आलों आतां सांगा चित्तीं । तुमच्या कोणतें दु:ख असे ।।८।। तेव्हां ते देव वृत्तान्त । वेदांस सांगती समस्त । तो ऐकून वेदमुख्य त्यांस दाखवित । मयूराचें स्वरूप ।।९।। तदनंतर ब्रह्ममय क्षेत्र पाहून । ज्योतिर्मय जें शोभन । सर्वही देव प्रणाम करून । प्रवेश करते जाहले ।।१०।। देवेश ते वेदांसहित । करिती प्रवेश विधियुक्त । वेदाज्ञेनें होऊन हृष्ट । स्थापिती मूर्ती मोरयाची ।।११।। पूजन करून ध्यानपर । विधानें जपती मंत्र थोर । निराहार राहून विघ्नहर । तोषविला त्या देवांनीं ।।१२।। त्या वेळीं ते देवेश स्थापित । ती उत्तम मूर्ति क्षेत्रांत । भाद्रपद शुक्ल चतुर्थीसी असत । समय होता माध्यान्हीचा ।।१३।। सोमवार स्वाति नक्षत्र महान । दैवयोगें शुभकाळ पाहून । शक्तीही परम शोभन । एकवटल्या त्या योगांत ।।१४।। अन्यशक्ति आदिशक्तीप्रत । प्रश्न तेव्हां विचारित । सृष्टिहीन स्थिति जेव्हां असत । मासादिक तेव्हां कैसे आले ।।१५।। हें कुतूहल आमुच्या चित्तांत । तें शमवावें सांप्रत । आदिशक्ति तैं उत्तर देत । ऐका शक्तींनो एकचित्तें ।।१६।। दृश्यभावात्मक काळ होत । युगायुगांत विनष्ट । सदा सर्व ब्रह्मयांत । ब्रह्माकार वर्ततसे ।।१७।। कालमानानें विघ्नेश योगनिद्रेंत ।

जेव्हां जग लय पावत । निद्राविहीन तो सृजित । उत्तमोत्तम सृष्टि सारी ।।१८।। ब्रह्मांत ब्रह्मरूप स्थित । काळ तो सदा मंडित । न कळतही जन जे सेवित । गणेशासी पूजिती ध्याती ।।१९।। ते नर होती सिद्धियुक्त। यांत संशय कांहीं नसत । कळत अथवा नकळत । स्पर्शितां अग्निकण जाळितो तसाची ।।२०।। माघ शुक्ल चतुर्थीस। गणेश देई वरदानास । अंगारकयुक्त मुहूर्तास । मूर्तीतून बाहेर प्रकटला ।।२१।। मयूरावर होता स्थित । ऐशा चतुर्भुज ढुंढीस पाहत। सिद्धिबुद्धीसमायुक्त । भालचंद्र महोदरासी ।।२२।। तीननेत्र शेष नाभीवर । चिंतामणिधर उदार । शूर्पकर्ण गजवदन मनोहर । एकदंतें सुशोभित ।।२३।। पाश अंकुश भग्नदन्त धरित । जो आपुल्या हातांत । भूषण वस्त्रांनी विराजित । ऐशा प्रभूस पाहती ।।२४।। तेव्हां उठून माझ्या सहित । त्यास भक्ति भावें वंदित । पूजिती स्तविती मुदितचित्त । ब्रह्मादि ते देवमुख्य ।।२५।। अनादिरूपास मोरवाहनास । निजनाथास सकल अवभासास । मनोवाणीहीनास । मनोवाणीवचस्था नमन ।।२६।। गणनाथा स्तुत्यासी । अनादि पुराणदेवासी । सकलादिपूज्यासी हृदिस्थासी । आनंदप्रदासी नमन असो ।।२७।। परेशासी चतु:प्रचा-लकासी । परमार्थभूतासी गणनाथासी । आपुल्या बळें जग निर्मिसी । स्तवनीया तुज नमस्कार ।।२८।। स्वबोधगासी जगीं ईशसंस्थासी । विदेहभावें सदा आत्मसंस्थासी । नमितों त्या गणनाथासी । त्यांच्या विहीन स्वसुखप्रलीन ।।२९।। अयोगरूपें निवृत्तिस्थ । निजात्मग योगधर स्वधीस्थ । त्या स्तुत्यास गणनाथास चित्तस्थ । नमितों आम्हीं भक्तीनें ।।३०।। स्वभक्तास शांतिप्रदाता । गजवक्त्रधर शांतिउद्गाता । चतुर्भुज एकरद सिद्धिदाता । त्रिनेत्रधर जो त्यास नमितों ।।३१।। महोदरासी पाशधरासी । बीजासी अमोघवीर्यासी । परात्परासी शूर्पकर्णासी । विभु

गणेशा तुज नमितों ।।३२।। गणनाथासी स्तुत्यासी । नमन सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवरूपासी । पाळक विष्णुरूपें होसी । संहार करिसी शंभुरूपानें ।।३३।। अनाथांच्या नाथासी । शक्तिमंतासी मोहधारकासी । कर्मरूपासी भानूसी । हेरंबासी नमितों आम्हीं ।।३४।। मयूरेशासी देवासी । मयूरध्वज धारकासी । विघ्नेशासी गणनाथासी । महाविघ्नचालका तुज नमितों ।।३५।। ब्रह्माचें तूं ब्रह्मरूप असत । देवादीसही शांति लाभे तुझ्यांत । ऐशा तुज आम्हीं मंदचित्त । कैसे स्तवूं पूर्णपणें ।।३६।। गणेशाना म्हणून नमितों । नाथा विनम्रपणें प्रार्थितों । महाभक्तिप्रिया तुज ध्यातो । तुष्ट होऊन भक्तरक्षण करी ।।३७।। ऐसें स्तवन करून । पुनरपि करिती गणेशास नमन । आनंदाश्रुयुक्त नयन । रोमांच त्यांच्या अंगावरी ।।३८।। त्यांस वरती उठवून । श्रीगणेश बोलती वचन । तुम्हीं रचिलेलें हें स्तोत्र महान । वाचका श्रोत्यासी सर्वद ।।३९।। पुरविन ऐशा नराचें वांच्छित । वर मागा तुम्ही सांप्रत । देईन मीं तपतोषित । स्थापना स्तोत्रें संतुष्ट ।।४०।। देवेश तेव्हां तयास प्रार्थिती । विघ्नेशा जरी संतुष्ट चित्ती । आम्हां वर देण्या कृपामति । दृढभक्ति दे तुझ्यापायीं ।।४१।। तैसेंच आमुचें कार्य सांगावें । स्वानंदानें जें जगीं व्हावें । गणाधीशा आम्हीं करावें । आज्ञापालन ही इच्छा असे ।।४२।। श्रीगणेश तेव्हां त्यांस सांगती । चतुर्मुख ब्रह्मदेवा तूं जगतीं । सृष्टि निर्माण करी सांप्रतीं । रजोयुक्त तूं आता ।।४३।। अहंविवर्जित तूं ब्रह्मा नावें ख्यात । होशिल या त्रिभुवनांत । विष्णु तूं चतुर्भुजयुक्त । सत्त्वयुक्त पालन करी ।।४४।। नाना अवतार घेऊन । माझें नित्य करून स्मरण । सिद्धि पावशील पावन । तुझें कार्य सांगितलें ।।४५।। पंचमुखा शिवा तूं करी प्रहार । ज्ञात जगांत होशील हर । माझें स्मरण करितां बंधहीन सत्वर । तूं होशील निःसंशय ।।४६।। चतुर्भुजें तुं क्रियायुक्त । मोहवी

या जगताप्रत । नानावेदविभागांनी मज पूजित । सिद्धि तुजला लाभेल तैं ।।४७।। शक्तिनामें होशील ख्यात । अनघे तूं सर्व शक्तियुक्त । सहस्रकर सूर्या तू जगांत । कर्माधार होऊनियां ।।४८।। चराचरांचें करी धारण । मज स्मरून हो बंधहीन । ऐसी आज्ञा त्या देवांस करून । विशेष सामर्थ्य प्रदान करी ।।४९।। जैसे संकल्पाची सिद्धि व्हावी । ऐसी बळप्राप्ति बरवी । देऊन तयांसी स्वभावीं । शक्ति नगर आयुधें ।।५०।। तैशीच वाहनादि निर्मून । तीं प्रत्येक मुख्य देवांस अर्पून । त्या मूर्तीत प्रवेशून । गजानन अन्तर्धान पावले ।।५१।। मुख्य देव तदनंतर जात । आपापल्या स्थानांप्रत । चराचर जग ते निर्मित । यथाभाग क्रीडा करिती ।।५२।। तेथ जे मुख्यरूप जगांत । देव प्रजापति मुखांतून उद्भूत। त्यास महेश ते पाठवित । मयूरेशाच्या सेवेसाठीं ।।५३।। ते गणेशाचें ध्यान करिती । मयूरक्षेत्रीं वर लाभती । आपापलीं कार्यें पार पाडिती। आपुल्या पदीं राहून ।।५४।। ऐशा क्रमें सर्व चराचरमय । मयूरेशास आराधिती नित्य । त्यायोगें सत्तायुक्त सुखमय । होऊन धन्य जाहले ।।५५।। तदनंतर सर्वांगभावें सेविती । मयूरेशासी परम प्रीती । क्षेत्रवासपर ते होती । देवींनो ते सर्व देव ।।५६।। शंकर त्या मयूरक्षेत्रांत । पुनरपि उग्र तप आचरित । गणेशवरदान लाभत । त्यायोगें महादेव जाहला तो ।।५७।। हें मयूरक्षेत्राचें महिमान । देवींनो सांगितलें मीं प्रसन्न । सर्व सिद्धिप्रद जें महान । ऐकतां वाचितां पुरुषार्थलाभ ।।५८।। धर्म अर्थ काम मोक्ष लाभत । अन्तीं ब्रह्ममय तो होत । जो हें माहात्म्य वाचून दाखवित । अन्य भाविकांसी श्रद्धेनें ।।५९।। यासम पावन त्रिभुवनांत । अन्य कांहींही नसत । वेदशास्त्र पुराणांत । सारांतलें हें सार असे ।।६०।। जो हें माहात्म्य ऐकेल । तो पुत्रपौत्रें युक्त होईल । सर्वही इच्छित लाभेल । अपुत्रास गुणवंत पुत्रलाभ ।।६१।। सर्वभावें

व्रतें करित । त्यास शतपट पुण्य लाभत । तीर्थें क्षेत्रमुख्यें सेवित । त्यांसी पुण्य शताधिक त्याहून ।।६२।। वेदशास्त्र पुराणें ऐकून । नरास लाभे जें फळ महान । त्याहून अधिक पुण्य लाभून । धन्य होतसे साधक ।।६३।। बहुत काय सांगूं मात । यासदृश साधन अन्य न पुनीत । सत्य हें त्रिवार उक्त । ऐसें तुम्हीं जाणावें ।।६४।। जेथ साक्षात ब्रह्मपति । स्वानंदवाचक क्षेत्र जगतीं । कमंडलू नदी वाहे त्वरितगति । त्यासम अन्य काय असणार? ।।६५।। ब्रह्मभूयादिक ख्यात । वेदादींत हें माहात्म्य अद्भुत । त्याची समता जगांत । शक्तींनो अन्या अधिक लाभेल कैसी ।।६६।। जो प्राणी नित्य भक्तियुक्त । हें माहात्म्य श्रद्धेनें वाचित । तो प्रत्यक्ष गणेशरूप होत । त्याच्या दर्शनें दुःखें हरती ।।६७।। अथवा शुक्ल कृष्ण चतुर्थीस । जो करी याच्या वाचनास । त्याच्या घेती जें दर्शनास । तेही पवित्र नर होती ।।६८।। जो संस्कारहीन न वाचित । अथवा हें कदापि न ऐकत । तो सदा पुण्यवंचित । दुःखी होईल निःसंशय ।।६९।। हें महिमान भक्तिहीन नराप्रत । युक्त न सांगावें जगांत । शठ पापयुक्त जे पाखंड निरत । त्यांना हें न सांगावें ।।७०।। जे विघ्नेश्वरास भावें भजती । त्यांना कैसी जन्मगती । विघ्नभयें त्यासी नसती । म्हणोनि भजा गणेशासी ।।७१।। सत्पात्र नर पाहून वाचन । करावें या चरित्राचें पावन । जो भक्तियुक्त असेल जन । तो यास न निंदील ।।७२।। देवींनो सर्व सार सांगितलें । सर्वप्रद जें परम भलें । तेथ जाऊन गणेशातें सेविलें । पाहिजे तुम्हीं भक्तियुक्त ।।७३।। तरीच देह धारणेचें फळ लाभेल । सार्थक जीवनाचें होईल । अन्यथा पतिततुल्य व्हाल । यांत संशय कांहीं नसे ।।७४।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते मयूरेशक्षेत्रमाहात्म्यसमाप्तिवर्णनं नाम त्रिशत्तमोऽध्यायः समाप्तः ।

